8/ १६१'

सार्वजनिक बांधकाम विभागातील रस्ते व्यवस्थापन योजनेच्या अंमलबजावणीकरिता अभ्यासगट नेमण्याबाबत........

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण २००९/प्र.क्र.१०७/रस्ते-१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०१ आक्टोबर, २००९

**प्रस्तावना :**

सार्वजनिक बांधकाम विभागातील प्रमुख राज्य मार्ग, राज्य मार्ग व प्रमुख जिल्हा मार्गाच्या बांधकाम व देखभाल दुरुस्तीकरिता अर्थसंकल्पातून (योजनांतर्गत व योजनेत्तर) निधी प्राप्त होतो.

सदर रस्त्यावरील विविध कामांना प्रशासकीय मान्यता देताना रस्त्याची स्थिती व त्यानुसार आवश्यक काम यांचे भविष्यातील ५ वर्षात नियोजन करण्याच्या दृष्टीने रस्ते व्यवस्थापन योजना (Road Management System) राबवावी यास्तव एक अभ्यासगट नेमण्याबाबत शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

सार्वजनिक बांधकाम विभागातील प्रमुख राज्य मार्ग, राज्य मार्ग व प्रमुख जिल्हा मार्गाच्या बांधकाम व देखभाल दुरुस्तीकरीता अर्थसंकल्पातून (योजनांतर्गत व योजनेत्तर) निधी प्राप्त होतो.

सदर रस्त्यावरील विविध कामांना प्रशासकीय मान्यता देताना रस्त्याची स्थिती व त्यानुसार आवश्यक काम यांचे प्रगतीतील आर्थिक वर्षापुढील ५ वर्षाचे पुनरावृत्ती (Rolling) पध्दतीने नियोजन करण्याच्या दृष्टीने रस्ते व्यवस्थापन योजना (Road Management System) राबवावी यास्तव खालील अधिकाऱ्यांचा एक अभ्यासगट स्थापन करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | श्री. सी. डी. फकीर | मुख्य अभियंता, पंतप्रधान ग्राम सडक योजना, | अध्यक्ष |
| २ | श्री. एस. एस. जोशी | उप सचिव (रा.म.) | सदस्य सचिव |
| ३ | डॉ. श्री. डी. टी. ठुबे | उप सचिव (रस्ते) | सदस्य |
| ४ | श्री. पाटील | MRSAC नागपूर | सदस्य |
| ५ | श्री. विवेक घारे | MRSAC नागपूर | सदस्य |
| ६ | श्री. महेश वासकर | ITCC नागपूर | सदस्य |
| ७ | श्री. अविनाश गुल्हाने | सहायक अभियंता, सा.बां.विभाग, नागपूर | सदस्य |

सदर अभ्यास गटाची कार्यकक्षा खालील मुद्यांच्या समावेश असणारी रस्ते व्यवस्थापन योजना तयार करणे अशी राहील :-

अ) प्रमुख राज्य मार्ग, राज्य मार्ग व प्रमुख जिल्हा मार्ग यांच्या सद्यःस्थितीचा बारचार्ट तयार करणे.

ब) सद्यस्थितीतील रोड इन्व्हेटरी तयार करणे.

क) भविष्यातील पाच वर्षात अर्थसंकल्पातून घेण्यात येणाऱ्या योजना व योजनेतर कामाचे नियोजन करणे.
ड) प्रशासकीय मान्यता देताना कामाचे नियोजन करणे.
इ) रस्त्यावरील कामांची भौतिक, आर्थिक, कार्यारंभ आदेश, कामाचा कालावधी इ. माहिती दर्शविणे.
ई) वरील सर्व माहिती शासकीय माहिती प्रणाली (GIS) ला लिंक अप करणे.
फ) रस्ते व्यवस्थापन योजनेचे संगणकीकरण करणे.

सदरहू अभ्यास गट वरील सर्व बाबींचा साकल्याने अभ्यास करुन आपला अहवाल शासन निर्णयाच्या दिनांकापासुन ३१ ऑक्टोबर, २००९ च्या आत अवर सचिव (नियोजन), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे सादर करील. प्राप्त आहवालाच्या अनुषंगाने संगणिकीकरणासंबंधीची पुढील सर्व कार्यवाही सदस्य सचिव यांचे अधिपत्याखालील कार्यासनामार्फत करण्यात यावी.

अभ्यास गटाच्या कामाकाजाबाबत होणारा खर्च संबंधित कार्यालयाच्या कार्यालयीन खर्चाचे लेखाशिर्षकातुन भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक 200910091844413001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

(डॉ.द.तु.ठुबे)
अधीक्षक अभियंता व पदसिध्द उपसचिव (रस्ते)

प्रति,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, ४०० ०३२.
मा.मंत्री (सा.बां./सा.उ.व.) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
सचिव (बांधकाम) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
सचिव (रस्ते) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
मुख्य अभियंता, पंतप्रधान ग्रामसडक योजना, ग्रामविकास मंडळ, मुंबई.
उप सचिव (रस्ते) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
उप सचिव (राम) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
संचालक, एम आर एस ए सी, नागपूर.
संचालक,माहिती तंत्रज्ञान व समन्वय केंद्र,पुणे, सा.बां.विभाग आवार,हॉटेल सागर प्लाझासमोर,कँप, पुणे
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर.
(निवडनस्ती) कार्यासन (रस्ते-१), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.